राज्यस्तरीय आदिवासी उपयोजना निधी
वितरण सन २०२४-२५

---

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: आवियो-२०२४/प्र.क्र.२३६(भाग-२)/जल-४**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : ३० मार्च, २०२५.

**वाचा :-** १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४ , १२ फेब्रुवारी, २०२५ व १७ मार्च,२०२५.
२) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग,नाशिक कार्यालयाचे पत्र जा.क्र./लेखा शाखा/धा-०७(२४-२५)/**२६४**/सन २०२५, दिनांक २७ जानेवारी, २०२५.
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : बीयुडी-२०२४/प्र.क्र.०२/ कार्यासन-६, दिनांक २८ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :** आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गतच्या १०१ ते २५० हेसिंक्ष असलेल्या उपसा सिंचन योजना हट्टीपाडा (देवगाव) ता. त्र्यंबकेश्वर, जि. नाशिक या प्रकल्पांसाठी आदिवासी विभागाने संदर्भीय क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिलेल्या निधीचे वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**निर्णय :** नाशिक जिल्ह्याच्या त्र्यंबकेश्वर तालुक्यात २४९ हेक्टर सिंचन क्षमता निर्माण करणाऱ्या **उपसा सिंचन योजना हट्टीपाडा (देवगाव)** या प्रकल्पाच्या कामांकरिता **रुपये २१०.१२ लक्ष (रुपये दोन कोटी दहा लक्ष बारा हजार फक्त) निधी** खालील अटी व शर्थींच्या अधीन वितरित करण्यासाठी याद्वारे, शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**अ)** वरील प्रकल्पाच्या कामांकरिता जलसंधारण महामंडळाकडून अथवा अन्य स्त्रोताकडून निधी उपलब्ध झाला असल्यास, याद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या रक्कमांचे आहरण अथवा वितरण करण्यात येवू नये,

**ब)** प्रशासकीय मान्यतेच्या तसेच शासनाने मान्य केलेल्या सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीपेक्षा जास्तीची रक्कम खर्च करण्यात येवू नये,

**क)** वरील प्रकल्पाच्या कामासाठी निधीची गरज नसल्यास, हि रक्कम कोणत्या ही परिस्थितीत परस्पर अन्य प्रकल्पासाठी वितरित करण्यात येवू नये,

**ड)** कोणत्याही कारणे निधी अखर्चित राहिल्यास, सदर रक्कम तातडीने शासनाकडे प्रत्यार्पित करावी,

**ई)** निधी वितरणासंबधीच्या वित्त विभागाच्या संदर्भिय परिपत्रकामधील मार्गदर्शक सूचनांचे व आदिवासी विकास विभागाच्या संदर्भीय आदेशामधील निदेशांचे काटेकोर अनुपालन करण्यात यावे.

**फ)** कामाच्या गुणवत्तेची खात्री करुन व त्याबाबत तक्रारी नसल्याची खातरजमा करुन केलेल्या कामाच्या देयकाआधारे निधीचे वितरण करावे व त्याबाबतचा अनुपालन अहवाल आदिवासी विकास विभागास व प्रस्तुत विभागास सादर करावा.

२.        याद्वारे वितरित करण्यात आलेली रक्कम प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक यांनी आहरित करुन, त्यांचे अधिनस्त संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकाऱ्यांकडे त्वरेने वितरित करावी.

३.        यावर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक
टी-६,
४७०२, लहान पाटबंधा-यावरील भांडवली खर्च
७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना
(०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना
(०१)(१८) राज्य एकत्रित निधी अंतर्गत लहान पाटबंधारे योजना
(राज्यस्तर योजना) (४७०२ ७७२१)
५३, मोठी बांधकामे

४.        उपरोक्त खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखाकार कार्यालयास सादर करुन त्याच्या प्रतीस्वाक्षरीत प्रती तसेच प्रकल्प पुर्ण झाल्यावर प्रकल्प पुर्णत्वाचे प्रमाणपत्र आदिवासी विकास विभाग व प्रस्तुत विभागास उपलब्ध करुन द्यावे.

५.        याद्वारे वितरित निधीचा ताळमेळ ठेवण्याची जबाबदारी संबधित प्रादेशिक जलसंधारण अधिकारी कार्यालयाची राहिल व अप्पर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र, पुणे हे सदर बाबींचे समन्वयक प्राधिकारी राहतील.

६.        प्रस्तुत आदेश, आदिवासी विकास विभागाच्या संदर्भीय आदेशामधील मान्यतेनुसार व वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रकान्वये प्रशासकिय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७.        प्रस्तुत आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करण्यात आले असुन सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आहेत. त्यांचा संकेताक २०२५०३३०१६५६२३०२२६ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

RAJESH HEMCHAND BAGDE

Digitally signed by RAJESH HEMCHAND BAGDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=ed7af9a8be3d880eda8e29b769ac16864ea0732c103c7f011129ff654701c22c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7A690C5B955786C61B12D2A97A09E71E030D081D0786B3D4740E1A0078F4684, cn=RAJESH HEMCHAND BAGDE
Date: 2025.03.30 16:57:07 +05'30'

**( रा. हे. बागडे )**
**महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

१. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
२. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
३. अप्पर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र, पुणे.
४. प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक.
५. जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर.

७. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
८. कक्ष अधिकारी, कार्यासन जल-११, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी, कार्यासन -०६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.निवड नस्ती, जल-४

**प्रत अग्रेषित,**

१. मा. विरोधीपक्ष नेता (विधान परिषद) विधानमंडळ, मुंबई यांचे कार्यालय.
२. स्थानिक लोकप्रतिनिधी (मार्फ़त संबधित ल.सिं.(जसं) उपविभागिय अभियंता).
३. मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव
४. सचिव (आदिवासी विकास विभाग) यांचे स्वीय सहाय्यक
५. सचिव (मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहायक.
६. आयुक्त, मृद व जलसंधारण, छत्रपती संभाजीनगर.